**कागल, जि. कोल्हापूर येथील श्रीमंत जयसिंगराव तलावाचे पर्यावरणीयदृष्ट्या संवर्धन व संरक्षण करण्यासाठी राबविण्यात येणाऱ्या प्रकल्पातील कामांसाठी निधी मुक्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रासयो-२००७/६८६/प्र.क्र.६० /तां.क.३**
नवीन प्रशासन भवन,१५ वा मजला,हुतात्मा राजगुरू चैाक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २६ ऑक्टोबर, २०१५

वाचा -

१. पर्यावरण विभागाचे समक्रमांकाचे शासन निर्णय दिनांक: २५ सप्टेंबर, २००७, दिनांक २३ जानेवारी, २००९, दि. २४ फ़ेब्रुवारी,२००९ व दि. १९ मार्च, २०१०.

२. मुख्याधिकारी, कागल नगरपरिषद, कागल, जि. कोल्हापूर यांचे पत्र क्रमांकः जा.क्र.३४५, दिनांक २२ मे, २०१५.

३. पर्यावरण विभागाचे दिनांक: १० सप्टेंबर, २०१५ रोजी निर्गमित आढावा बैठकीचे इतिवृत्त.

प्रस्तावना-

राज्यातील तलाव, सरोवरे व मोठे जलाशय यांचे पर्यावरणीयदृष्ट्या संवर्धन करण्यासाठी राज्य शासनाने राज्य सरोवर संवर्धन योजना सन २००६-०७ या वर्षापासून सुरू केली आहे. या योजनेंतर्गत सन २००७-०८ या वर्षात कागल नगरपरिषद हद्दीतील श्रीमंत जयसिंगराव तलावाच्या प्रस्तावास उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देवून निधी वितरित करण्यात आलेला होता.

उपरोक्त मान्यतेच्या अनुषंगाने कागल, जि. कोल्हापूर येथील श्रीमंत जयसिंगराव तलावाच्या संवर्धनाची मंजूर कामे पूर्ण झालेली असून अ.मु.स (पर्यावरण) यांच्या स्तरावरून घेण्यात आलेल्या दि. २९ ऑगस्ट, २०१५ रोजीच्या बैठकीतील निर्णयानुसार राज्यशासन हिस्स्यापैकी उर्वरित निधी मुक्त करण्याचे शासन विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

राज्य योजनेखाली राज्य सरोवर संवर्धन योजनेअंतर्गत कागल जि. कोल्हापूर येथील श्रीमंत जयसिंगराव तलावाचे पर्यावरणीयदृष्टया संवर्धन करण्यासाठी एकूण मंजूर निधी रू. २, ६०, ४६,६६६/- (अक्षरी रूपये दोन कोटी साठ लक्ष सेहेचाळीस हजार सहाशे सहासष्ठ फक्त) पैकी अनुज्ञेय राज्य हिश्श्यांच्या ९०% म्हणजे रु. २,३४,४१,०००/- (अक्षरी रूपये दोन कोटी चौतीस लक्ष एकेचाळीस हजार फक्त) एवढा निधी उपलब्ध करुन द्यावयाचा आहे. त्यापैकी संबंधितांना अनक्रमे रू.१००.०० लक्ष, ८२.३२ लक्ष व १८.२७ लक्ष असे एकूण २००.५९ लक्ष एवढा निधी वितरित करण्यात आलेला होता. योजनेंतर्गत मंजूर संवर्धन कामे पूर्ण झालेली असून आता या शासन निर्णयाद्वारे राज्य हिस्स्यापैकी उर्वरीत निधी रु. ३३,८२,०००/- (अक्षरी रूपये तेहतीस लक्ष ब्याऐंशी हजार फ़क्त) इतकी रक्कम मुख्याधिकारी, नगरपरिषद कागल, जि. कोल्हापूर यांना वितरित करण्यास संदर्भाधीन दि. २५ सप्टेंबर, २००७, रोजीच्या शासन निर्णयातील सर्व अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

२. यासाठी मुख्याधिकारी, नगरपरिषद, कागल, जि. कोल्हापूर (Chief Officer, Kagal Nagarparishad, Dist. Kolhapur) यांचे नावे रु. ३३, ८२, ०००/- (अक्षरी रु. तेहतीस लक्ष ब्याऐंशी हजार फ़क्त) एवढ्या रकमेचा धनादेश काढण्यात यावा.

३. मुख्याधिकारी, नगरपरिषद, कागल, जि. कोल्हापूर यांना अदा करावयाची रू.३३.८२ लक्ष एवढी रक्कम अधिदान व लेखाधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून मुख्याधिकारी,नगरपरिषद, कागल, जि. कोल्हापूर यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री. वि.गो. कडू, कार्यासन अधिकारी, पर्यावरण विभाग व नियंत्रक अधिकारी म्हणून श्री. सो.ना. बागुल, उपसचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय यांना घोषीत करण्यात येत आहे. त्यांनी मुख्याधिकारी, नगरपरिषद,कागल, जि. कोल्हापूर यांना रू.३३.८२ लक्ष /- (अक्षरी रुपये तेहतीस लक्ष ब्याऐंशी हजार फ़क्त) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथून स्वतंत्र धनादेशाद्वारे वितरित करण्याची कार्यवाही करावी.

४. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च "मागणी क्र.यु-४, ३४३५-परिस्थितिकी व पर्यावरण, ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण,१०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०२)(०७) राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५ ०१८२), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)" या मुख्य लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ वर्षात अर्थसंकल्पीत रू.६३७.०० लक्षच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली वर्गीकृत करण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१५ / प्र.क्र.८५ / अर्थ- ३ दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील परि. क्र.७ (क) अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. तसेच प्रमाणित करण्यात येते की, उपरोक्त परिपत्रातील अटींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२११०५९०९३४०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Somnath Namdeo Bagul

Digitally signed by Somnath Namdeo Bagul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b01714c1480a47cec5943a1c3c73ea95af0534418cf92d1ac844331c4116879d, cn=Somnath Namdeo Bagul
Date: 2015.11.04 17:30:52 +05'30'

**(सो.ना. बागुल)**
**उपसचिव, पर्यावरण विभाग**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),महाराष्ट्र १/२,मंबई/ नागपूर.
४. मुख्याधिकारी, नगरपरिषद, कागल, जि. कोल्हापूर.
५. जिल्हाधिकारी, जिल्हा कार्यालय, कोल्हापूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मंबई.
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८. मा.मंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.

९. मा.राज्यमंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
१०. अपर मुख्य सचिव, पर्यावरण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
११. प्रधान सचिव, नगरविकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
१२. वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१३. नियोजन विभाग, कार्यासन क्र.१४७२, मंत्रालय, मंबई.
१४. रोखशाखा, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवडनस्ती.